# नेटाक्षरी

ई - साहित्य प्रकाशन , वर्ष : तिसरे , अंक : ४ , दिनांक : २४.०७.२०११

**संपादक**

स्वप्ना कोल्हे ( नाशिक )

**सहसंपादक**

सोनाली घाटपांडे ( पुणे )
भारती सरमळकर ( मुंबई )
सचिन काकडे ( मुंबई )

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी netaksharee@gmail.com

## ..आपला हिंदुस्थान..

अथांग सागर..उत्तुंग हिमालय , हिरवे गालिचे.. रेगिस्तान
कुठे फुल तर कुठे पत्थर,असा हा हिंदुस्थान..आपला हिंदुस्थान
चाणक्य इथला,इथलाच बिरबल
खगोल ज्योतिषी..इथले अव्वल
इथेच जन्मले..कित्येक गणिती,विचारवंत,विद्वान !
कुठे फुल तर कुठे पत्थर
असा हा हिंदुस्थान..आपला हिंदुस्थान
शिवबा..राणा,इथेच जन्मले
इथेच उमटली लक्ष्मीची पाऊले
गोविंद सिंग़ अन अशोक,चन्नम्मा,इथलाच पृथ्वीराज चौहान
कुठे फुल तर कुठे पत्थर,असा हा हिंदुस्थान..आपला हिंदुस्थान
टागोर इथले,इथल्याच टेरेसा
पूजली गेली,इथेच अहिंसा
बोस,पटेल,टिळक,भगत हे,मूर्तिमंत स्वाभिमान
कुठे फुल तर कुठे पत्थर,असा हा हिंदुस्थान..आपला हिंदुस्थान
तेंडल्याचा अफाट छक्का
तसाच लताचा सूर ही पक्का
बच्चन,कलाम,कल्पना चावला,या भूमीची शान !
कुठे फुल तर कुठे पत्थर,असा हा हिंदुस्थान..आपला हिंदुस्थान
सरहद्द इथली हळवी नाही
शक्ती आमची फसवी नाही
बुऱ्या नजरेची चिरेल गर्दन,हर एक इथला जवान
कुठे फुल तर कुठे पत्थर
असा हा हिंदुस्थान..आपला हिंदुस्थान
वेळ खरी ही आली आता ,विजयी करु प्रजेची सत्ता
पुन्हा निघेल धूर सोन्याचा,गाठेल थेट अस्मान
कुठे फुल तर कुठे पत्थर,असा हा हिंदुस्थान..आपला हिंदुस्थान



- मंदार चोळकर,पुणे

.. भव्यभारती..

नवीन भारत असा घडवू , सुवर्ण मुकूटी माणिक मढवू
भूमातेच्या चरणांवरती , नवसृजनाचा प्रसाद चढवू

आधुनिक होऊ शेतकरी , परंपरा तरी वारकरी
जोडू किनारे प्रेमाचे , नद्यांचेही कितीतरी

नको हिंसा नको दहशत , शत्रू उतता दावू ताकद
सदैव जागे राहूनि राखू , अपुली सीमा अपुली सरहद्द

दास होऊया परिश्रमाचे , कर्तव्य निभावू चतुःश्रमाचे
होऊनि मुक्त व्यसनातूनि , मोह त्याग विश्रामाचे

पोर दिसता कुणी उपाशी,कवळूनि घेऊ त्यास उराशी
कणवेने भरवुनि कवळ , मैत्र जोडूया करुणेशी

व्यवहार करु सचोटीने , काम करु हातोटीने
स्वच्छ करुया भ्रष्टाचारा , मानवतेच्या तुरटीने

नाठाळ नसे आप परका , दोषी बंधुही रिपु सारखा
सोडवू खटले थटलेले , न्यायात नको फक्त तारखा

उजळून टाकू दिव्यभारती , भयमुक्त गाऊ काव्यभारती
पोलादाच्या कणखरतेने , नवी निर्मुया भव्यभारती

- सारंग भणगे,पुणे



## ..शंभर कोटी लोकांच्या..लोकांसाठीच्या देशा..

शंभर कोटी लोकांच्या अगाध चिरंतन देशा
पूसायच्या बाकी आहेत काही अस्पष्ट रेषा
धर्माच्या जातीच्या मनामधल्या रातीच्या

शंभर कोटी लोकांच्या निश्चल सनातन देशा
गाठायच्या बाकी आहॅत काही उज्वल रेषा
समृद्धीच्या उन्नतीच्या स्वप्नांमधल्या प्रगतीच्या

शंभरकोटी लोकांच्या अस्वस्थ शोषित देशा
आखायच्या बाकी आहेत काही नियम रेषा
सत्याच्या न्यायाच्या विरोधात अन्यायाच्या

शंभर कोटी लोकांच्या माझ्या स्वतःच्या देशा
चल सत्य करुया स्वप्ने पुर्ण करुया आशा
आपणच मारू आपल्या हाती आपल्या भविष्यरेषा

*- आनंद 'भारत' माने,सोलापूर*



## ..देस रंगिला रंगिला ( भावानुवाद )..

प्रत्येक पावली इथे धरा बदलते रंग
इथल्या बोली जणू रांगोळीचे सात रंग
हिरव्या पगडीत ऋतु सजले
निळ्या चादरीत आकाश दडले
नदी सोनेरी,हिरवा सागर गोड हा सजला
देश रंगिला रंगिला,देश माझा रंगिला

लाल लाल गालांचा सूर्य करतो बघा खोडी
लाजऱ्या शेतांची बावरी पिवळी ही ओढणी
रंगली ओढणी,रंगीत अंगणी रंग हा उधळला
देश रंगिला रंगिला,देश माझा रंगिला

अबिर गुलालाचे चेहरे इथे
मस्त अशी ही टोळी
रंग हास्याचे,रंग खुशीचे
नात्यांची जणू होळी
कथांचे रंग,शपथांचे रंग,स्नेहरंग दाटला
देश रंगिला रंगिला,देश माझा रंगिला

प्रेमाचा रंग इथे गहिरा
चढल्यावर ना उतरे
सच्च्या प्रेमाचा पक्का रंग
पसरे पण ना विखुरे
रंग साजाचा,रंग लाजेचा सुंदर शर्मिला
देश रंगिला रंगिला,देश माझा रंगिला

- अभिजीत गलगलीकर,पुणे



## ..नव्या मनूचे स्वप्न..

जग थोडेसे बदलले तरी काही बिघडले नाही
नव्या मनूचे स्वप्न पाहणे आम्ही सोडले नाही
कोण कळेना आपुला दूजा,जग हे स्वार्थी बनले
पाश रेशमी तरी प्रेमाचे आम्ही तोडले नाही

आज घराचे वासे आमुच्या का न कळे हे फिरले
वैफल्याने ग्रासुनी घरटे आम्ही मोडले नाही
माणुसकीचा ऱ्हास आमुच्या हळू हळू होतांना
खापर त्याचे दुजा शिरावर आम्ही फोडले नाही

दोष जयांचा आहे त्यांच्या पदरी टाकले माप
साप सोडूनि भुईस कधीही आम्ही झोडले नाही
दोष आमुचा दाखविणारे कुणी भेटले मार्गी
त्यांचे म्हणणे अट्टाहासे आम्ही खोडले नाही

विज्ञानाचा वर मनुजाला शाप भासतो आहे
त्याचे नाते संहाराशी आम्ही जोडले नाही
जग थोडेसे बदलले तरी काही बिघडले नाही
नव्या मनूचे स्वप्न पाहणे आम्ही सोडले नाही

*- कर्नल अशोक सायनाकर,पुणे*



## ..माझ्या प्रियतम भारत देशा..

हिंदुस्थाना आर्यावर्ता
गर्वे गाऊ तुझीच गाथा
तुझ्याचसाठी विनम्र माथा
तूच आमुचा भाग्यविधाता
तूच आमची वैभवरेषा
माझ्या प्रियतम भारत देशा

रामायण घडले ज्या भूमीवर
गीता कथिली जिथे मनोहर
त्या भूमीतच जन्म मिळावा
भाग्य आमुचे असे खरोखर
ब्रम्हा,विष्णू,तूच महेशा
माझ्या प्रियतम भारत देशा

परकीयांचे पाऊल पडले
जुलूमाने जन जेरीस आले
अभिमानी मन पेटून उठले
तुझ्याचसाठी प्राण वाहिले
बलीवेदी ही देत संदेशा
माझ्या प्रियतम भारत देशा

या भमीशी निष्ठा ज्याची
या भूमीवर प्रिती ज्यांची
नाते त्यांचे अमुचे अतूट
पंथ भेद ना त्यास अडविती
अभिमानाने गर्जती दिशा
माझ्या प्रियतम भारत देशा

- शैलजा शेवडे,नवी मुंबई





## ..गणतंत्र दिवस..

आला गणतंत्र दिवस आला
नेमेचि येतो तसा येईल
लाल किल्ल्यावर नेहमी सारखा सोहळा होईल

आमचे सैनिक पंतप्रधानांना सलामी ठोकतील
सैनिकांच्या कवायती होतील,नवीन शस्त्रं प्रदर्शित करतील
हर राज्यातील तरुण तरुणी फ्लोटवर राज्याचा उत्कर्ष दाखवतील
बाळ गोपाळ मंडळी आधी कडाक्याच्या थंडीत कुडकुडतील
मग उन्हात करपून जातील
पंतप्रधान छापील भाषण वाचून दाखवतील
तेच ते रटाळ भाषण ऐकून श्रोते कंटाळतील
घोषणाबाजी होईल,नंतर सगळे पंचतारांकित हॉटेलमध्ये पार्ट्या झोडतील

गरीब बिचारा नागरिक देशसेवेच्या गप्पा मारत उपाशी राहिल
जसा तो गेली ६७ व वर्ष तेच करत आलाय
ह्याची नाही कोणाला चिंता,जो तो आपली पोळी ओढतोय
ढेरीवर हात फिरवतोय भरले खिसे रिकामे होत आहेत
सकाळी फडकणारे झेंडे सर्वत्र विखुरले आहेत
तुडवले जात आहेत पायदळी,त्याची नाही कुणाला तमा

जो तो आपला आनंद साजरा करतोय
"गणतंत्र दिवस झिंदाबाद"

*- श्रीकांत पाटील,मुंबई*



# नेटाक्षरीतर्फे सर्व भारतीयांना प्रजासत्ताक दिनाच्या हार्दिक शुभेच्छा



रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय.नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ६0000 मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो.त्या व्यतिरिक्त संकेतस्थळाला भेट देऊन वाचणाऱ्यांची संख्याही लक्षणीय आहे.हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लाभावा हीच इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

– ई साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामुल्य ई साप्ताहिके –

स्वरनेटाक्षरी ऑडिओ अल्बम , बाल नेटाक्षरी , ई श्टाप

– प्रसिध्द झालेली ई बुक्स –

टल्लीची शाळा,मकरंदच्या त्रिवेण्या,ग्रेव्हयार्ड लिटरेचर,चार क्षण,तो आणि ती,प्रियेचे अभंग,देशी दारुचे दुकान, ई शाळा , तो , मी आणि सिगरेट, मोरया, लोकल गोष्टी , मीरा(अनुवाद),ओथंब,सावळ्या मुलीची गाणी

आमची ई बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी - esahity@gmail.com

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी - netaksharee@gmail.com

समाप्त